# महाराष्ट्र शासन
## गृह विभाग
**शासन ज्ञापन क्रमांक सुप्रमा-१२१६/प्र.क्र.८३३/पोल-७.**

मंत्रालय, दुसरा मजला, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई-४०००३२.

दिनांक ८ जून २०१८.

**विषय** :- पोलीस ठाणे, आजरा, तालुका-आजरा, जिल्हा-कोल्हापूर, याच्याकरिता नवीन प्रशासकीय इमारतीचे उरलेले बांधकाम करण्यासाठी प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

**संदर्भ** :-
१) शासन निर्णय, गृह विभाग, क्रमांक सीआरपी-०३०९/४३०/प्र.क्र.१८०/पोल-७, दिनांक २२.०२.२०१०.
२) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. विअप्र-२०१४/ प्र.क्र.४९/ १४/ विनियम, दिनांक ०५.०१.२०१५.
३) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम, भाग-२, दिनांक १७.०४.२०१५.
४) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई, यांचे पत्र क्र. पोमसं/ २७-बी/ २८-बी-२/ कोल्हापूर-आजरा/ ३४८/ २००८, दिनांक ०१.१२.२०१६.
५) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई, यांचे पत्र क्र. पोमसं/ २७-बी/ २८-बी-२/ कोल्हापूर-आजरा/ ३४८/ २००८, दिनांक ०३.१०.२०१७.
६) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम (दक्षिण) विभाग, कोल्हापूर, यांचे पत्र क्र. प्रशा/इमारती/२५०१/२०१७, दिनांक ०९.०८.२०१७.

**ज्ञापन.-**

पोलीस ठाणे, आजरा, तालुका-आजरा, जिल्हा-कोल्हापूर, याच्याकरिता नवीन प्रशासकीय इमारतीचे बांधकाम करण्यासाठी शासन निर्णय, गृह विभाग, क्रमांक सीआरपी-०३०९/ ४३०/ प्र.क्र.१८०/ पोल-७, दिनांक २२.०२.२०१०, द्वारे रु.४३,६०,०६०/- इतक्या खर्चाच्या अंदाजास प्रशासकीय मान्यता देण्यात आली होती. उक्त खर्चाचे अंदाज हे सन २००६-०७ च्या दरसूचीवर आधारित होते.

२. उप मुख्य वास्तुशास्त्रज्ञ, सार्वजनिक बांधकाम विभाग, पुणे, यांनी तयार केलेल्या आराखड्यानुसार उक्त प्रशासकीय इमारतीचे बांधकाम क्षेत्रफळ हे ४५९ चौ.मी. इतके आहे. यापैकी, गृह विभागाने सार्वजनिक बांधकाम विभागास उक्त कामासाठी उपलब्ध करुन दिलेल्या निधीतून २०५.४० चौ.मी. क्षेत्रफळ बांधकाम पूर्ण करण्यात आले असून उरलेल्या २५३.६० चौ.मी. क्षेत्रफळाच्या वाढीव बांधकामासाठी सन २०१६-१७ च्या दरसूचीनुसार तयार करण्यात आलेले रु.१५४ लक्ष इतक्या खर्चाचे अंदाज सादर करण्यात आले आहेत. या खर्चाच्या अंदाजात विद्युतीकरण, पाणी पुरवठा, मलनि:सारण, संरक्षण भिंत, अंतर्गत रस्ते, *"Rain water harvesting"* अग्नि प्रतिबंधक (यंत्रणा), जमिनीचा विकास व बाग, माती सर्वेक्षण, फर्निचर, इत्यादी साठी तरतूद करण्यात आली आहे.

३. उक्त खर्चाचे अंदाज हे उप अभियंता, सार्वजनिक बांधकाम उप विभाग, आजरा, यांनी तयार केले असून ते (१) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम (दक्षिण) विभाग, कोल्हापूर, (२) अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडल, कोल्हापूर, आणि (३) पोलीस अधीक्षक, कोल्हापूर, यांनी साक्षांकित केले आहेत.

४. उक्त खर्चाचे अंदाज हे सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई, यांनी तपासले आहे व ते **रु.१६४.४५ लक्ष** असे सुधारित केले आहेत व त्याप्रमाणे, विवक्षित अटींवर, प्रशासकीय मान्यता देण्यास सहमती दिली आहे.

५. त्या अनुसार, पोलीस ठाणे, आजरा, तालुका-आजरा, जिल्हा-कोल्हापूर, याच्याकरिता नवीन प्रशासकीय इमारतीचे उरलेले बांधकाम करण्यासाठी **रु.१६४.४५ लक्ष** इतक्या खर्चाच्या अंदाजास, पुढील अटींवर, याद्वारे प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे:-

१) उक्त काम सार्वजनिक बांधकाम विभागामार्फत करण्यात यावे.
२) बांधकामाचा नमुना नकाशा, मांडणी नकाशा आणि विस्तृत नकाशा यांना वास्तुशास्त्रज्ञाकडून मंजूरी घेऊनच काम सुरु करावे.
३) ढोबळ स्वरुपात धरण्यात आलेल्या तरतुदींबाबत विस्तृत खर्चाचे अंदाज मंजूर करुनच काम हाती घ्यावे.
४) प्रत्यक्ष काम करताना शासन निर्णय, पर्यावरण विभाग, क्र. इएनव्ही-२०१३/ प्र.क्र.१७७/ तां.क.-१, दिनांक १०.०१.२०१४, अनुसार कार्यवाही करावी.
५) शासन निर्णय, सार्वजनिक बांधकाम विभाग, क्र. बीडीजी-२०१७/ प्र.क्र.६०/ इमारती-२, दिनांक ०७.०७.२०१७, मधील तरतुदींचे अनुपालन करण्यात यावे.
६) उक्त कामाची नियोजित जागा ही गृह विभागाच्या ताब्यात असल्याचे प्रमाणपत्र प्राप्त केल्यावरच निविदा सूचना प्रसिध्द करण्यात याव्या.
७) निधी उपलब्ध झाल्याशिवाय काम सुरवात करु नये.

६. उक्त कामासाठी येणारा खर्च हा गृह विभाग--मागणी क्रमांक बी-१०, ४०७०, इतर प्रशासनिक सेवांवरील भांडवली खर्च, (००) ८००, इतर खर्च, (००)(११) महाराष्ट्र राज्य पोलीस गृहनिर्माण पोलीस विभागाच्या कार्यालयीन इमारतीचे बांधकाम करणे, (४०७० ०२११), ५३, मोठी बांधकामे, याखाली उपलब्ध असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

७. हे ज्ञापन सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.४४४/इमा-२, दिनांक १९.०५.२०१८ अन्वये मिळालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

८. हे ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा सांकेतांक २०१८०६०८१९४४१११८२९ असा आहे. हे ज्ञापन डीजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Swapnil Gopal Borse

Digitally signed by Swapnil Gopal Borse
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=66835707253ff77ef0e333eb3ad582f9b876d443b2654088832e43dcad21c52a, cn=Swapnil Gopal Borse
Date: 2018.06.08 19:44:18 +05'30'

**( स्वप्नील गोपाल बोरसे )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

१) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२) विशेष पोलीस महानिरीक्षक, कोल्हापूर परिक्षेत्र, कोल्हापूर.
३) पोलीस अधीक्षक, कोल्हापूर.

**प्रत :-**

१) अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडल, कोल्हापूर (*सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, यांनी दिलेल्या "Recapitulation Sheet" च्या प्रतीसह).*
२) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम (दक्षिण) विभाग (*सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, यांनी दिलेल्या "Recapitulation Sheet" च्या प्रतीसह).*
३) जिल्हा कोषागार अधिकारी, कोल्हापूर.
४) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर.
५) कार्यासन अधिकारी (इमा-२), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
६) कार्यासन अधिकारी (व्यय-७), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
७) निवड फाईल (पोल-७).